**<u>प्रशासकीय मान्यता</u>**

**खरीप हंगाम सन २०२४ करीता युरिया व डीएपी खताचा संरक्षित साठा (Buffer Stock) करुन ठेवणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : खसंसा ३५२४/प्र.क्र. ६९/१७-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १५/०३/२०२४

<u>वाचा:-</u>

१. कृषि विभागाचा शासन निर्णय क्र. राखते २०१२/ प्र.क्र. ३५३/१७-अे, दि. १५/०२/२०१३.
२. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/ खते/ गुनि ३-४/ बफर /२४-२५/ ६४०१/२०२४, दि. २६/०२/२०२४.
३. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/ खते/ गुनि ३-४/ बफर /२४-२५/७२३९/२०२४, दि. ०४/०३/२०२४.

<u>प्रस्तावना:</u>

राज्यामध्ये खरीप हंगामात जून, जुलै व ऑगस्ट या कालावधीमध्ये शेतकऱ्यांकडून खताची मागणी, खरेदी व प्रत्यक्ष वापर मोठया प्रमाणावर होत असतो. या कालावधीमध्ये निरनिराळया कारणांमुळे म्हणजेच, मुळातच आबंटन कमी असणे, पाऊस किंवा अतिवृष्टीमुळे रेल्वे वाहतुकीमध्ये अडथळा येणे, रेल्वे रेक वेळेवर उपलब्ध न होणे, खत उत्पादन कारखाने कार्यान्वित नसणे इत्यादीमुळे खताच्या मागणीप्रमाणे पुरवठा करण्यावर विपरीत परिणाम होतो. खरीप हंगाम जून महिन्यापासून सुरु होत आहे. खरीप हंगामातील पेरणीच्या वेळी व उभ्या पिकांना खताचा दुसरा हप्ता देणे यामुळे युरिया व डिएपी खतांच्या मागणीमध्ये वाढ होत असते. शेतकऱ्यांच्या मागणीप्रमाणे खताची उपलब्धता होण्यासाठी खरीप हंगाम २०२४ करीता युरिया व डिएपी खताचा संरक्षित साठा करुन ठेवणे आवश्यक आहे. सदर बाब विचारात घेऊन वाचा येथे नमूद अ. क्र. १ येथील शासन निर्णयानुसार नियुक्त करण्यात आलेल्या मंत्रिमंडळ उपसमितीच्या दिनांक ११ मार्च, २०२४ रोजी झालेल्या बैठकीमध्ये राज्यात खरीप २०२४ मध्ये युरिया खताचा १.५० लाख मे. टन व डिएपी खताचा ०.२५ लाख मे. टन संरक्षित साठा (Buffer Stock) करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर मान्यतेच्या अनुषंगाने राज्यामध्ये युरिया व डिएपी खताची पुरेशी उपलब्धता होण्यासाठी संरक्षित साठा करुन ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

खरीप हंगाम २०२४ मध्ये राज्यातील शेतकऱ्यांना मागणीप्रमाणे व वेळेवर युरिया व डिएपी खतांचा पुरवठा करण्यासाठी युरिया १.५० लाख मे. टन व डिएपी ०.२५ लाख मे. टन खताचा संरक्षित साठा (Buffer Stock) करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर प्रयोजनार्थ महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ मर्या., मुंबई, दि महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड, मुंबई व दि विदर्भ को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड, नागपूर यांना खालील प्रमाणात खतांचा संरक्षित साठा करण्यास शासनाचे "नोडल एजन्सी" म्हणून नियुक्ती करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| **महामंडळाचे नाव** | **युरिया (१५०००० मे. टन)** | **डिएपी ( २५००० मे. टन)** |
|---|---|---|
| महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, मुंबई **(७०%)** | १०५००० मे. टन | १७५०० मे. टन |
| दि महाराष्ट्र स्टेट को-ऑप. मार्केटिग फेडरेशन, मुंबई **(२०%)** | ३०००० मे. टन | ५००० मे. टन |
| दि विदर्भ को-ऑप. मार्केटिंग फेडरेशन लि., नागपूर **(१०%)** | १५००० मे. टन | २५०० मे.टन |

त्यानुसार युरिया व डिएपी खताचा संरक्षित साठा करण्यास येणारा खर्च खालीलप्रमाणे राहील :-

**अ) खरीप हंगाम २०२४ ( एप्रिल २०२४ ते ऑगस्ट २०२४) युरिया संरक्षित साठा १.५० लाख मे.टन साठा करण्यास येणारा खर्च ( युरीया प्रती टन दर रु. ५८८९/-)**

| **अ.क्र.** | **खर्चाचा प्रकार** | **खर्चाचा तपशील** | |
|---|---|---|---|
| | | खरीप २०२४ करीता प्रस्तावित दर (प्र.मे.टन) (रुपयांत) | एकूण प्रस्तावित खर्च (प्र.मे.टन) (रुपयांत) |
| **अ)** | | | |
| १. | उतराई | ₹ ८३.०० | ₹ ८३.०० |
| २. | भराई | ₹ ८३.०० | ₹ ८३.०० |
| ३. | गोदाम भाडे ( ५ महिन्या करीता) | ₹ ८८.०० | ₹ ४४०.०० |
| ४. | दुय्यम वाहतुक | ₹ ४८४.०० | ₹४८४.०० |
| **ब)** | | | |
| १. | कर्जावरील बँकेचे व्याज (५ महिन्या करीता) | ९% | ₹ २२०.०० |
| २. | सेवा शुल्क | २% | ₹ ११७.०० |
| ३. | विमा खर्च (५ महिन्या करीता) | ०.५० % | ₹ ३०.०० |
| | **एकूण ( अ + ब)** | | **₹ १४५७.००** |

**(टिप :- प्रस्तावित खर्चाव्यतिरिक्त वस्तु व सेवा कर (GST) अनुज्ञेय दराने अदा करण्यात यावे.)**

**ब) खरीप हंगाम २०२४ ( एप्रिल २०२४ ते ऑगस्ट २०२४) डिएपी (DAP) ०.२५ लाख मे. टन साठा करण्यास येणारा खर्च (डी.ए.पी प्रती टन रु. २६८००/-)**

| अ.क्र. | खर्चाचा प्रकार | खर्चाचा तपशील | |
|---|---|---|---|
| | | दर (प्र.मे.टन) (रुपयांत) | एकूण प्रस्तावित खर्च (प्र.मे.टन) (रुपयांत) |
| **अ)** | | | |
| १. | उतराई | ₹ ८३.०० | ₹ ८३.०० |
| २. | भराई | ₹ ८३.०० | ₹ ८३.०० |
| ३. | गोदाम भाडे ( ५ महिन्या करीता) | ₹ ८८.०० | ₹ ४४०.०० |
| ४. | दुय्यम वाहतुक | ₹ ४८४.०० | ₹४८४.०० |
| **ब)** | | | |
| १. | कर्जावरील बँकेचे व्याज (५ महिन्या करीता) | ९ % | ₹ १००५.०० |
| २. | सेवा शुल्क | २ % | ₹ ५३६.०० |
| ३. | विमा खर्च ( ५ महिन्या करीता) | ०.५० % | ₹ १३४.०० |
| | **एकूण ( अ+ ब)** | | **₹ २७६५.००** |

**(टिप :- प्रस्तावित खर्चाव्यतिरिक्त वस्तु व सेवा कर (GST) अनुज्ञेय दराने अदा करण्यात यावे.)**

२. **प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-**

१) उपरोक्त तिन्ही संस्थांनी वरीलप्रमाणे संरक्षित साठा करण्यासाठी युरिया व डिएपी खताची किंमत आगाऊ भरावी.

२) या प्रयोजनासाठी उपरोक्त नमूद केलेला खर्च हा अंदाजित असल्याने उपरोक्त प्रमाणे प्रस्तावित केलेला खर्च किंवा प्रत्यक्षात झालेला खर्च यापैकी जी कमी असेल ती रक्कम अदा करण्यात येईल.

३) व्याजाची गणना करताना युरीयाचा दर रु.५८८९/- प्र.मे.टन व डिएपी चा दर रु.२६८००/- प्र.मे.टन इतका धरलेला आहे. संरक्षित साठा करताना दरात बदल झाल्यास ज्या दराने साठा खरेदी होईल त्या दराप्रमाणे व्याजाची गणना करण्यात यावी.

४) गोदाम भाडे, विमा खर्च व व्याजाची गणना खरीप हंगामासाठी ५ महिन्यांसाठी केलेली आहे. तथापि प्रत्यक्ष साठा ज्या कालावधी करता केला जाईल त्या कालावधीसाठी गोदाम भाडे, विमा खर्च व व्याज देय राहील.

५) जिल्हा निहाय व नोडल एजन्सी निहाय युरीया व डी.ए.पी. खतांच्या संरक्षित साठ्यांचे नियोजन आयुक्त (कृषि), पुणे यांनी त्यांच्या स्तरावर करावे.

६) सर्व गावांमध्ये युरीया / डिएपी उपलब्ध होण्याच्या दृष्टीने संरक्षित साठयाच्या गोदामांच्या संख्येत वाढ करण्यात यावी. प्रत्येक मंडळ मुख्यालय तसेच बाजारांच्या मोठया गावांमध्ये संरक्षित साठा गोदाम उपलब्ध करावे,जेणेकरुन विकेंद्रीत स्वरुपात संरक्षित साठा ठेवला जाईल.

७) संरक्षित साठा करण्यासाठी निवडलेल्या गोदामांची यादी उपरोक्त तिन्ही संस्थांनी संबंधित कृषि विकास अधिकारी/ जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांच्याकडे द्यावी. सदर यादीस संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी/ कृषि विकास अधिकारी यांनी ७ दिवसात मान्यता द्यावी. ७ दिवसात मान्यता न दिल्यास यादीस मान्यता आहे असे गृहीत धरुन संरक्षित साठा करण्याची कार्यवाही संबंधित संस्थांनी करावी.

८) संरक्षित साठा करण्याची जबाबदारी ही प्रत्येक जिल्हयाचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी/ कृषि विकास अधिकारी यांची राहील. खत कंपन्याकडून जिल्हयात येणाऱ्या खतांमधून संरक्षित साठयासाठी युरीया/ डिएपी उपलब्ध करुन दिला जाईल याची दक्षता संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी/ कृषि विकास अधिकारी यांनी घ्यावी.

९) जिल्हयांना आबंटीत केलेला संरक्षित साठा एप्रिल २०२४ पूर्वी तयार न झाल्यास त्याची जबाबदारी जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी/ कृषि विकास अधिकारी यांची राहील.

१०) संरक्षित साठयाचे वितरण झाल्यानंतर प्रत्येक महिन्याची देयके नोडल एजन्सीद्वारे पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत कृषि विभागाकडे सादर करावीत. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचेकडून देयकांची छाननी करुन महिन्याच्या १५ तारखेपर्यंत कृषि आयुक्तालयास सादर करावीत.

११) सदर बाबीकरीता होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा :-

**मागणी क्रमांक : डी-३**
**१०५, खते व रासायनिक खते,**
**(००) (००) (३१) डीएपी व मिश्र रासायनिक खतांचा पुरवठा**
**करण्यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता अर्थसहाय्य (कार्यक्रम)**
**३३, अर्थसहाय्य ( २४०१ ८२०८)**

१२) संरक्षित साठा करण्यासाठी येणाऱ्या खर्चाची प्रतिपूर्ती करताना प्रचलित शासन निर्णय/ नियम/ परिपत्रक यामधील तरतुदीनूसार अंमलबजावणी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकारांचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३१५१५३११९४८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by PIMPALE PRASHANT RAMESH
Date: 2024.03.15 17:33:55 +05'30'

**( प्रशांत र. पिंपळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
३. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, गोरेगाव, मुंबई
५. दि विदर्भ को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड, नागपूर.
६. दि महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड, मुंबई.
७. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
८. कृषि संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. कृषि सहसंचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
११. सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी / कृषि विकास अधिकारी.
१२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३. उप संचालक (खते), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४. प्रशासन अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५. वित्त विभाग (व्यय-१, अर्थसंकल्प -१३ ), मंत्रालय, मुंबई
१६. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई
१७. कार्यासन (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. १७-अे कार्यासन, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई (निवडनस्ती).